# कार्यावली

**सोमवार, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२० रोजी दुपारी १२.०० वाजता मुंबई येथील विधान भवनात सुरू होणा-या महाराष्ट्र विधानपरिषदेच्या सन २०२० च्या द्वितीय (अर्थसंकल्पीय) अधिवेशनाची कार्यावली.**

| | | |
|---|---|---|
| **एक** | : | सभापतींनी, सभापती-तालिका नामनिर्देशित करणे. |
| **दोन** | : | प्रश्नोत्तरे |
| **तीन** | : | अध्यादेश सभागृहासमोर ठेवणे. |
| **चार** | : | राज्यपालांच्या अभिभाषणावर चर्चा |
| **पाच** | : | सन २०२०-२०२१ चा अर्थसंकल्प सादर करणे व त्यावर सर्वसाधारण चर्चा करणे. |
| **सहा** | : | सन २०१९-२०२० च्या पुरवणी मागण्या सादर करणे व त्यावर चर्चा करणे. |
| **सात** | : | सन २०१४-२०१५, २०१५-२०१६ व २०१६-२०१७ या वर्षाच्या अतिरिक्त खर्चाच्या मागण्या सादर करणे व त्यावर चर्चा करणे. |
| **आठ** | : | विधानपरिषद आश्वासन समितीचा अहवाल सादर करणे. |
| **नऊ** | : | मंत्र्यांनी कागदपत्रे सभागृहासमोर ठेवणे. |
| **दहा** | : | शासकीय विधेयक |
| **अकरा** | : | इतर शासकीय कामकाज ज्याची सूचना नंतर देण्यात येईल. |
| **बारा** | : | शोक प्रस्ताव |
| **तेरा** | : | इतर प्रस्ताव |
| **चौदा** | : | तातडीच्या व सार्वजनिक महत्वाच्या बाबींवर अल्पकालीन चर्चा- म.वि.प.नियम ९७ अन्वये |
| **पंधरा** | : | तातडीच्या व सार्वजनिक महत्वाच्या बाबींकडे मंत्र्यांचे लक्ष वेधणे-म.वि.प.नियम १०१ अन्वये |

एचबी २७८४-१

**सोळा : अशासकीय विधेयके-विचारार्थ—**

**(१)** सन २०१६ चे वि.प.वि.क्रमांक २ – महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध (सुधारणा) विधेयक, २०१६- **श्री. ख्वाजा बेग, वि.प.स. यांचे**

**(२)** सन २०१७ चे वि.प.वि. क्रमांक १ – महाराष्ट्र ज्येष्ठ नागरिक वयोमर्यादा विधेयक, २०१७- **श्री. रामहरी रुपनवर, वि.प.स. यांचे**

**(३)** सन २०१७ चे वि.प.वि. क्रमांक ३ – महाराष्ट्र शेतकरी, कारागीर व भूमिहीन मजूर यांना निवृत्तीवेतन देण्याबाबत विधेयक, २०१७-**श्री. रामहरी रुपनवर, वि.प.स. यांचे**

**(४)** सन २०१७ चे वि.प.वि. क्रमांक ४ – महाराष्ट्र स्वयंसेवी संस्था विकास व व्यवस्थापन महामंडळ विधेयक, २०१७-**श्री.रामहरी रुपनवर, वि.प.स. यांचे**

**(५)** सन २०१८ चे वि.प.वि. क्रमांक ३ – महाराष्ट्र सावकारी (नियमन) (सुधारणा) विधेयक, २०१८-**श्रीमती विद्या चव्हाण, वि.प.स. यांचे**

**(६)** सन २०१९ चे वि.प.वि. क्रमांक २ – महाराष्ट्र शैक्षणिक परिसंस्था (व्यवस्थापन) (सुधारणा) विधेयक, २०१९-**श्री.नागोराव गाणार, वि.प.स. यांचे**

**(७)** सन २०१९ चे वि.प.वि. क्रमांक ३ – महाराष्ट्र महानगरपालिका (सुधारणा) विधेयक, २०१९- **श्री.शरद रणपिसे, वि.प.स. यांचे**

**सतरा :** अशासकीय ठराव (म.वि.प. नियम १०२)

**श्री. विलास पोतनीस वि.प.स. यांचे ठराव क्रमांक १, २, ४ व ५**

(१) " राज्यात उद्योग क्षेत्रात मोठ्या प्रमाणावर स्थानिक भूमीपुत्रांना रोजगार उपलब्ध न होणे, राज्यातील उद्योगांमध्ये स्थानिक भूमीपुत्रांची संख्या नगण्य असल्याने राज्यात बेरोजगार युवकांची संख्या मोठ्या प्रमाणावर वाढलेली आहे, राज्यातील सेवानियोजन कार्यालयात नोकरीसाठी लाखांहून अधिक स्थानिक बेरोजगार युवकांनी केलेली नोंद, उद्योगांमध्ये भुमिपुत्रांना रोजगार मिळत नसल्याने राज्यातील सुशिक्षित तरुणांमध्ये पसरत चाललेली नैराश्याची भावना, राज्यातील बेरोजगार भूमिपुत्रांच्या रोजगाराच्या हक्काचे रक्षण करण्यासाठी यापुढे राज्यातील शासकीय, निमशासकीय तसेच खाजगी आस्थापनावर, औद्योगिक क्षेत्र यांमध्ये नोकर भरती करताना स्थानिक भूमीपुत्रांना प्राधान्याने नोकरीत सामावून घेण्याबाबत शासनाने धोरणात्मक निर्णय घ्यावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(२) " राष्ट्रीयस्तरावर भारतीय प्रशासकीय सेवा, भारतीय पोलीस सेवा व तत्सम विविध स्पर्धा परीक्षांमध्ये उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्यांमध्ये इतर राज्याच्या तुलनेत राज्यातील विद्यार्थ्यांचे अत्यल्प प्रमाण लक्षात घेता हे प्रमाण वाढविण्यासाठी व उमेदवारांची अद्ययावत व योग्य पद्धतीने पूर्वतयारी करून घेण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात किमान एक प्रशासकीय सेवा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याच्या दृष्टीने आवश्यक ती उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(४) " राज्यातील सर्व शासकीय व निमशासकीय कार्यालयात आणि सर्व स्तरावरील न्यायालयात, तसेच राज्याच्या एकंदरीत शासकीय व्यवहारांमध्ये मराठी भाषेचा १०० टक्के वापर होण्याच्या दृष्टीने आवश्यक ती उपाययोजना करण्याची जबाबदारी राज्य शासनाने मराठी भाषा विभागाकडे सोपवावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(५) " राज्यातील खेळाडूंची राष्ट्रीय स्तरावर होत असलेली पीछेहाट लक्षात घेता क्रीडा क्षेत्राचा सर्वांगीण विकास होण्याकरिता व दर्जेदार खेळाडू निर्माण करण्यासाठी तालुकास्तरावर क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यात यावीत व त्यासाठी प्रशिक्षित मार्गदर्शक नेमण्यात यावेत तसेच अशा केंद्रांना अद्ययावत क्रीडा साहित्य व आर्थिक सहाय्य देण्यात यावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. किरण पावसकर वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ६, ७, ८, ९ व १०**

(६) " कोकणातील विशेषतः रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग व ठाणे या चार जिल्हयांसाठी एक स्वतंत्र मत्स्य विद्यापीठ स्थापन करून त्यामध्ये मत्स्यव्यवसायासंबंधी विविध अभ्यासक्रम अंतर्भूत करावेत,अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(७) " राज्यातील खेळाडूंची राष्ट्रीयस्तरावर होत असलेली पिछेहाट लक्षात घेता क्रिडा क्षेत्राचा सर्वांगीण विकास होण्याकरिता व दर्जेदार खेळाडू तयार करण्यासाठी तालुकास्तरावर क्रिडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यात यावीत व त्यासाठी प्रशिक्षित मार्गदर्शक नेमण्यात यावेत तसेच अशा केंद्रांना आवश्यक ते साहित्य पुरविण्यात यावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(८) " राज्यात राष्ट्रीय महामार्ग व राज्य महामार्गावर मोठ्या प्रमाणात होत असलेले अपघात, अपघातस्थळी अपघातग्रस्तांवर उपचार करण्यासाठी शासकीय रुग्णालये नाहीत, त्यामुळे या राष्ट्रीय व राज्य महामार्गावर सार्वजनिक आरोग्य विभागाच्या माध्यमातून लहान-लहान उपचार केंद्रे सुरू करणे, सदरची उपचार केंद्रे सुरू झाल्यास तेथे वैद्यकीय अधिकारी, स्टाफ नर्सेस व इतर कर्मचारी

यांची नेमणूक केली गेली तर सुशिक्षित बेरोजगारांना रोजगार मिळून राज्यातील बेरोजगारी दूर होण्यास मदत होईल तसेच अपघातग्रस्तांवर वेळीच उपचार होतील. म्हणून राज्यमार्ग व राष्ट्रीय महामार्गावर प्रत्येक ५० कि.मी. अंतरावर एक उपचार केंद्र उभारावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(९) " राज्यात पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी तसेच त्या ठिकाणी पर्यटकांसाठी मार्गदर्शक नेमणे व अन्य आवश्यक त्या सोयीसुविधा उपलब्ध करून देऊन त्या माध्यमातून तेथील युवकांना रोजगार उपलब्ध करून देण्यासाठी राज्यातील सर्व पर्यटन स्थळांचे महत्त्व कायम राखण्याच्या दृष्टीने राज्य शासनाने खास उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(१०) " राज्यातील सुशिक्षित बेरोजगारांचे वाढते प्रमाण व त्यांच्यात रोजगाराअभावी निर्माण झालेले वैफल्याचे व असंतोषाचे वातावरण लक्षात घेता बेरोजगारांची समस्या परिणामकारक पध्दतीने सोडविण्यासाठी सेवायोजन आणि रोजगार व स्वयंरोजगार कार्यालये अधिक कार्यक्षम करण्यासाठी तसेच संबंधित प्रश्नावर उपाययोजना सुचविण्यासाठी विधीमंडळाच्या दोन्ही सभागृहातील सदस्यांची एक संयुक्त समिती स्थापन करण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. हेमंत टकले वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ११, १३, १४ व १५**

(११) " महाराष्ट्र राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात लाखो विद्यार्थी शिक्षण घेत आहेत, विद्यार्थ्यांच्या राज्यभर जिल्हास्तरीय वेगळ्या क्रीडा, सांस्कृतिक, सामाजिक, नाट्य व वादविवाद स्पर्धा शासनातर्फे आयोजित करण्यात येतात, परंतु या विद्यार्थ्यांना जिल्ह्याजवळच्या ठिकाणी निवासाची व्यवस्था नसल्यामुळे स्पर्धेचे यशस्वी आयोजन होत नाही, त्यामुळे विद्यार्थ्यांवर अन्याय होतो, त्यांची गैरसोय टाळण्याकरिता प्रत्येक जिल्ह्यात शासनातर्फे विद्यार्थी भवनाची उभारणी करून त्याची योग्य ती देखभाल करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(१३) " राज्यात महिला व बालविकास विभागामार्फत चालविण्यात येणा-या शेकडो वसतिगृहात निवास करून अध्ययन करीत असलेल्या हजारो विद्यार्थ्यांना दर्जात्मक शिक्षण, सकस आहार व आरोग्यविषयक सुविधा मिळत नसल्यामुळे त्यांचा शारीरिक व बौध्दिक विकास खुंटत आहे, या विद्यार्थ्यांना आवश्यक त्या परिपूर्ण सुविधा मिळण्यासाठी शासनाने कालबध्द कार्यक्रम आखावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(१४) “ राज्यातील दूरदर्शन तसेच केबल नेटवर्कद्वारा प्रसारित होणा-या विविध चॅनेलद्वारा अश्लील व हिंसाचारी चित्रपट, जाहिराती व विविध विषयांवरील मालिका सर्रासपणे प्रसारित केल्या जातात, परिणामी तरुण पिढीवर व बालमनावर त्यांचे होणारे दुष्परिणाम व वाढते लैंगिक गुन्हे लक्षात घेता, या सर्व वाहिन्यांवरील अश्लील कार्यक्रमांवर तात्काळ बंदी घालावी यासाठी राज्य शासनाने केंद्र शासनाकडे पाठपुरावा करावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(१५) “ राज्यातील धार्मिक स्थळांच्या व तिर्थक्षेत्राच्या ठिकाणी भाविकांची होणारी अफाट गर्दी, परंतु धार्मिक स्थळी व तिर्थक्षेत्राकडे लाखोच्या संख्येने येणा-या भाविकांना स्थानिक प्रशासनाकडून योग्य त्या सर्वसामान्य प्राथमिक सोयीसुविधाही उपलब्ध करून दिल्या जात नाहीत, परिणामी दर्शनाच्यावेळी चेंगराचेंगरीत शेकडो भाविक मृत्यू पावतात, अनेक जण गंभीर जखमी होतात, या घटना क्लेशदायक असल्याने राज्यातील अशा ठिकाणी शासनाने योग्य सुविधांचे नियोजन करण्याच्यादृष्टीने योजना आखून त्यांची अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

**श्री. विक्रम काळे वि.प.स. यांचे ठराव क्रमांक १६, १७, १८ व २०**

(१६) “ राज्यात महिला व बालविकास विभागामार्फत चालविण्यात येणा-या शेकडो वसतिगृहात निवास करून अध्ययन करीत असलेल्या हजारो विद्यार्थ्यांना दर्जात्मक शिक्षण, सकस आहार व आरोग्यविषयक सुविधा मिळत नसल्यामुळे त्यांचा शारीरिक व बौध्दिक विकास खुंटत आहे, या विद्यार्थ्यांना आवश्यक त्या परिपूर्ण सुविधा मिळण्यासाठी शासनाने कालबध्द कार्यक्रम आखावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(१७) “ राज्यातील बहुसंख्य गावात विशेषतः उन्हाळ्यात पिण्याच्या पाण्याची भासत असलेली भीषण पाणीटंचाई, विविध कारणामुळे बंद पडलेल्या अनेक पाणीपुरवठा योजना व त्यांच्या देखभालीत होणारी कुचराई, परिणामी ग्रामीण जनतेचे पिण्याच्या पाण्यासाठी होणारे हाल विचारात घेता पाणीटंचाई कायमस्वरुपी दूर करण्यासाठी शासनाने एक खास कार्यक्रम आखून त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(१८) “ राज्यातील सर्व विद्यार्थ्यांना घ्यावयाचे सर्व माध्यमातील शिक्षण हे अधिक परिणामकारक, प्रभावी होण्यासाठी आणि भविष्यात सक्षम पिढी उभी राहण्यासाठी सर्व शिक्षण विभाग (शालेय शिक्षण, उच्च शिक्षण, तंत्रशिक्षण, आश्रमशाळा, अंध, अपंग, मूक-बधिर शाळा, आदिवासी आश्रम शाळा) हे मंत्रालयातील एकाच विभागाच्या अधिपत्याखाली आणावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(२०) " राज्यात सातत्याने वाढणारी लोकसंख्या, त्याच प्रमाणात वाढणारी वाहनांची संख्या होणारे दररोजचे अपघात, त्यामुळे होणारी जीवितहानी हे टाळण्यासाठी राज्यातील सर्व राष्ट्रीय व राज्यमार्ग तसेच जिल्ह्या-जिल्ह्याला जोडणारे रस्ते हे चौपदरी करावेत, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. आनंद ठाकूर वि.प.स. यांचे ठराव क्रमांक २१, २२, २३ व २४**

(२१) " राज्यात ४१७ ठिकाणी सरकारी औद्योगिक प्रशिक्षण केंद्र (आयटीआय) उपलब्ध असून तेथे १७८ एवढेच पाठ्यक्रम वर्ग चालविले जातात, त्यातील अनेक पाठ्यक्रम हे कालबाह्य झाले असून विविध क्षेत्रात आधुनिक तंत्रज्ञान आले असतानाही जुन्याच तंत्रज्ञानावर आधारीत प्रशिक्षण दिले जात आहे, औद्योगिक प्रशिक्षण केंद्रामध्ये (आयटीआय) प्रशिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांच्या ज्ञानात भर पडण्यासाठी नवीन पाठ्यक्रम सुरू करण्याची आवश्यकता, यासाठी राज्य शासनाने उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(२२) " पालघर जिल्ह्यातील डहाणू व जव्हार या भागात पदवी, पदव्यूत्तर शिक्षणाची सोय नसल्यामुळे विद्यार्थ्यांची उच्च शिक्षणासाठी होत असलेली परवड, ज्या विद्यार्थ्यांना वैद्यकीय, अभियांत्रिकी, विधि, आयटीआयसाठी प्रवेश घेण्याची इच्छा आहे त्यांना पालघर किंवा मुंबई या ठिकाणी जावे लागते, परिणामी स्थानिक विद्यार्थ्यांचे होणारे हाल विचारात घेता, उक्त तालुक्यातील विद्यार्थ्यांची परवड थांबविण्यासाठी या ठिकाणी वैद्यकीय, अभियांत्रिकी, विधि, फार्मसी, नर्सिंग व सर्वेअर या क्षेत्रातील गुणवत्तापूर्ण उच्च महाविद्यालये स्थापन करण्यासाठी राज्य शासनाने तातडीने उपायोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(२३) " पालघर जिल्ह्यातील मोखाडा, जव्हार, विक्रमगड, वाडा, तलासरी, डहाणू, पालघर आणि वसई या बहुसंख्य गावात विशेषतः उन्हाळ्यात पिण्याच्या पाण्याची भासत असलेली भीषण पाणीटंचाई, विविध कारणांमुळे बंद पडलेल्या अनेक पाणीपुरवठा योजना व त्यांच्या देखभालीत होणारी कुचराई, परिणामी ग्रामीण जनतेचे पिण्याच्या पाण्यासाठी होणारे हाल विचारात घेता पाणी-टंचाई कायमस्वरुपी दूर करण्यासाठी शासनाने एक कालबद्ध कार्यक्रम आखून त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(२४) " पालघर हा आदिवासी जिल्हा असल्याने जिल्ह्यातील आदिवासींचा विकास साधण्याच्या दृष्टीने डहाणू, कासा, जव्हार, मोखाडा, नाशिक या रेल्वे मार्गाचे काम हाती घेण्यासाठी कोकण रेल्वे महामंडळाच्या धर्तीवर एक स्वायत्त रेल्वे महामंडळ स्थापन करून हा रेल्वेमार्ग विहीत मुदतीत पुर्ण करण्यासाठी राज्य शासनाने केंद्र शासनाकडे आग्रह धरावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. ख्वाजा बेग वि.प.स. यांचे ठराव क्रमांक २७, २८, २९ व ३०**

(२७) " राज्यातील अत्यल्प व अल्पभूधारक शेतक-यांच्या शेतीतील विहिरी व विद्युत-पंपाचा मोठ्या प्रमाणात राहिलेला अनुशेष, विद्युत जोडणी मिळण्याकरीता होणारा विलंब त्यामुळे विद्युतपंपावर घेतलेल्या कर्जाचा वाढत असलेला आर्थिक बोजा, शेतात राबविल्या जाणा-या ऊस पिकांचे पाण्याअभावी होणारे नुकसान टाळण्याच्या दृष्टीने व उक्त योजनेची अंमलबजावणी परिणामकारकरित्या करण्यासाठी शासनाने धोरणात्मक कार्यक्रम राबवावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(२८) " शेतक-यांना शेती व्यवसायासाठी लागणारी रासायनिक खते, अवजारे, किटकनाशके यांच्या किंमतीमध्ये सतत होणारी वाढ, तसेच शेतक-यांना शेतमालाचे न परवडणारे भाव विचारात घेता उत्पादन खर्चावर आधारित असे शेतमालाचे भाव शेतक-यांना मिळण्याच्या दृष्टीने राज्य शासनाने आग्रही भूमिका घ्यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(२९) " विदर्भात नापिकी, अतिवृष्टी, जलप्रकोप, दुबार पेरणी, तिबार पेरणी, ओला व कोरडा दुष्काळ असूनही पीक विमा नुकसानभरपाईपासून आणेवारी व उंबरठा उत्पन्नाच्या जाचक निकषामुळे शेतकरी वंचित राहत आहेत, याला शंभर वर्षे जुनी ब्रिटिशकालीन आणेवारी व उंबरठा काढण्याचे निकष कारणीभूत असल्याने त्यात बदल करून सुधारित आणेवारी व उंबरठा काढण्याचे निकष तयार करण्यासाठी राज्य शासनाने केंद्र शासनाकडे आग्रही भूमिका घ्यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(३०) " पावसाळ्यातील पाण्याची अनियमितता, निसर्गाचा लहरीपणा, त्यामुळे निर्माण होणारी भीषण पाणीटंचाई परिणामी पिण्याच्या पाण्यासाठी होणारी भटकंती ही अतिशय गंभीर बाब झालेली आहे, त्यावर जलतज्ज्ञांच्या मार्गदर्शनातून वेगवेगळी उपाययोजना करण्याची आवश्यकता, उदा. रेन वॉटर हार्वेस्टींग, परंतु याबद्दलची अंमलबजावणी होताना दिसत नाही, महाराष्ट्रातील सर्व शासकीय इमारतींच्या छतावर पडणा-या पावसाच्या पाण्याचे एकत्रीकरण (रेन वॉटर हार्वेस्टींग) करून त्याचे इमारतीच्या आवारातील जमिनीत पाण्याच्या स्त्रोताजवळ पुनर्भरण करण्याची आवश्यकता आहे, यामुळे जलस्त्रोत रिचार्ज होऊन परिणामी, पिण्याच्या पाण्याचा प्रश्न मार्गी लागेल, यासाठी शासकीय आस्थापनांना निर्देश द्यावेत, तसेच खाजगी नवीन इमारत बांधकाम करीत असताना बांधकाम परवाना देण्यासाठी जसे इतर बाबी तपासण्यात येतात तसेच (ग्रामपंचायत ते महानगरपालिका) त्या इमारतीवरील छताचे पाणी त्या आवारातील जलस्त्रोतात सोडण्याचे नियोजन आहे किंवा कसे हे तपासूनच बांधकाम परवाना द्यावा अशा सूचना स्थानिक स्वराज्य संस्थांना शासनाने निर्गमित कराव्यात, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(शा.म.मु.) एचबी २७८४-३ (२५०-२-२०२०)

**प्रा. जोगेन्द्र कवाडे वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ३१, ३२, ३८ व ४५**

(३१) "राज्यातील अनेक भागात पुरातन बौद्ध स्तूप, लेण्यांच्या भग्न वास्तूची दुरवस्था झाल्याचे निदर्शनास येत आहे, काही भागातील बौद्ध स्तूप व लेण्यांना अनधिकृत बांधकामे तसेच झोपडपट्ट्यांचा विळखा पडलेला आहे, या बौद्ध स्तूप व लेण्यांविषयीच्या माहितीचा उल्लेख पुरातत्व शास्त्रज्ञांच्या शोध प्रबंधामध्येही आढळून येतो, या पुरातन वास्तूंचे जतन व संवर्धन करण्याकरिता शासनाने धोरण ठरवून त्याची तातडीने अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(३२) "मुला मुलींना लहानाचे मोठे केल्यानंतर मोठे झालेल्या मुलांकडून ब-याच वेळा आपल्या आई वडीलांची सतत अवहेलना/अपमान करण्यात येत असते, म्हातारपणी मुलगा/ मुलगी आपला आधार आहे, अशी भोळी-भाबडी आशा बाळगून आई वडील आपल्या मुला मुलींना कोणतीही गोष्ट कमी पडू देत नसतात, म्हातारपणी मुले आई वडीलांची सेवा सुश्रुषा न करता त्यांना वृद्धाश्रमात अथवा इतरत्र सोडून देतात अथवा अपमानित करून घराच्या बाहेर काढतात, आयुष्याच्या शेवटी मुला-सूनांकडून त्यांना योग्यप्रकारे वागणूक मिळत नाही, म्हातारपणी मुलांनी आपल्या आई-वडीलांचा सांभाळ करावा, त्यांची सेवा-सुश्रुषा करावी याकरिता शासनाने निश्चित धोरण ठरवावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(३८) "राज्यातील अनेक शहरात इंटरनेट व केबल टिव्हीच्या केबलचे जाळे विणलेले दिसून येते, या केबल्स एका इमारतीवरुन दुस-या इमारतीवर तसेच झाडांवरुन, रस्त्यांवरुन, मोबाईल टॉवर्सवरुन, राज्यमार्ग व महामार्गाच्या दुतर्फा टाकण्यात येतात, पावसाळ्यात या केबल्समुळे अनेक अपघात होतात, या केबल्सबाबत शासनाने तातडीने नियमावली तयार करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(४५) "महाराष्ट्रात अनेक नद्यांचा उगम होत असून त्या नद्यांच्या पाण्यामुळे अनेक गावे, शहरे सुजलाम-सुफलाम झालेली आहेत, सद्यःस्थितीत सर्वत्र होत असलेल्या सिमेंटच्या जंगलांच्या अतिक्रमणांमुळे या नद्यांचे पात्र कमी होत आहेत, या नद्यांमध्ये गावातील तसेच शहरातील मैला, घाण पाणी सोडण्यात येते, सिमेंटीकरणामुळे अनेक नद्यांची उगमस्थाने नष्ट होत आहेत, पाणी हेच जीवन असून नैसर्गिक स्त्रोत बंद करून तेथे अवैध बांधकामे करण्यात येत आहेत, नद्यांच्या नैसर्गिक स्त्रोतांचे जतन करून नद्यांच्या संवर्धनाकरिता शासनाने निश्चित धोरण ठरवून त्याची तत्परतेने अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. अशोक ऊर्फ भाई जगताप वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ३३, ३४ व ३७**

(३३) " भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३७१ अन्वये राज्यातील मराठवाडा, विदर्भ व उर्वरित महाराष्ट्रासाठी यापूर्वी स्थापन करण्यात आलेल्या वैधानिक विकास मंडळाच्या धर्तीवर कोकण प्रदेशासाठी स्वतंत्र वैधानिक विकास मंडळाची स्थापना करण्याबाबत राज्य शासनाने कार्यवाही करून त्याबाबत केंद्र शासनाकडे आग्रही भूमिका घ्यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(३४) " केंद्र शासनाने राज्यात मुख्य रस्त्यापासून खेडेगावांना जोडण्याकरिता पंतप्रधान ग्रामसडक योजना अंमलात आणलेली आहे. त्याच धर्तीवर राज्यात पांदण रस्तादुरुस्ती व मुख्यमंत्री सडक योजना राज्य शासनाने सुरू कराव्यात, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(३७) " मुंबई व उपनगरातील खाजगी विकासकांनी बांधलेल्या सदनिकांच्या किंमती सर्वसामान्याच्या आवाक्याबाहेर असल्याने म्हाडाने मुंबई व उपनगरातील नागरिकांसाठी मोठ्या प्रमाणावर सर्वसामान्य ग्राहकांना परवडतील अशा सदनिका बांधण्याचा कालबद्ध कार्यक्रम शासनाने तातडीने हाती घ्यावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. रामहरी रुपनवर वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ४०, ४१, ४२, ४३ व ४४**

(४०) " राष्ट्रीयस्तरावर भारतीय प्रशासकीय सेवा, भारतीय पोलीस सेवा व तत्सम विविध स्पर्धा परीक्षांमध्ये उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्यांमध्ये इतर राज्याच्या तुलनेत राज्यातील विद्यार्थ्यांचे अत्यल्प प्रमाण लक्षात घेता हे प्रमाण वाढविण्यासाठी व उमेदवारांची अद्ययावत व योग्य पद्धतीने पूर्वतयारी करून घेण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात किमान एक प्रशासकीय सेवेसंदर्भातील प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याचे दृष्टीने आवश्यक ती उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(४१) " थोर समाजसुधारक व स्त्रीशिक्षण चळवळीचे प्रणेते महात्मा ज्योतिबा फुले व ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले या दोन समाज प्रबोधकांना मरणोत्तर भारतरत्न पुरस्कार प्रदान करण्यात यावा, अशी मागणी राज्य शासनाने केंद्र शासनाकडे करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(४२) " राज्यात महिला व बालविकास विभागामार्फत चालविण्यात येणा-या शेकडो वसतिगृहात निवास करून अध्ययन करीत असलेल्या हजारो विद्यार्थ्यांना दर्जात्मक शिक्षण, सकस आहार व आरोग्यविषयक सुविधा मिळत नसल्यामुळे त्यांचा शारीरिक व बौद्धिक विकास खुंटत आहे, या विद्यार्थ्यांना आवश्यक त्या परिपूर्ण सुविधा मिळण्यासाठी शासनाने कालबद्ध कार्यक्रम आखावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(४३) " शासनातर्फे राज्यातील मागासवर्गीय विद्यार्थ्यांना शाळा व महाविद्यालयामार्फत शिष्यवृत्ती व शुल्क सवलत दिली जाते, त्याच धर्तीवर राज्यातील अल्पभूधारक शेतकरी कुटूंबातील पाल्यांना शाळा व महाविद्यालयांमार्फत शिष्यवृत्ती व शुल्क सवलत देण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(४४) " राज्यातील खेळांडूची राष्ट्रीयस्तरावर होत असलेली पिछेहाट लक्षात घेता क्रीडा क्षेत्राचा सर्वांगीण विकास होण्याकरिता व दर्जेदार खेळाडू तयार होण्यासाठी तालुकास्तरावर क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यात यावीत व त्यासाठी प्रशिक्षित मार्गदर्शक नेमण्यात यावेत व अशा केंद्रांना अद्ययावत क्रीडा साहित्य पुरविण्यात यावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. शरद रणपिसे वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ४६ व ४७**

(४६) " राज्यातील मुंबई, पुणे, नागपूर यासह बहुसंख्य शहरांची लोकसंख्या मोठ्याप्रमाणात वाढत आहे, या शहरांच्या विविध भागात दरवर्षी वाढत असलेले कच-याचे ढीग, कच-याचे व्यवस्थापन करण्यात महानगरपालिकांना येत असलेले अपयश, कच-यांच्या ढिगांमुळे अनेक भागात रोगराई पसरुन नागरीकांच्या आरोग्यास निर्माण झालेला धोका, दुर्गंधी पसरल्यामुळे रस्त्यावरुन नागरीकांना जाणे-येणे कठीण झाले आहे, महानगरपालिकांनी यावर परिणामकारक उपाययोजना आखण्याची आवश्यकता असतानाही त्यांच्याकडून तशी कार्यवाही होत नाही, नागरीकांच्या आरोग्याशी हा प्रश्न निगडीत असल्यामुळे शासनस्तरावरुन यात लक्ष घालण्याची आवश्यकता विचारात घेता कच-याची विल्हेवाट लावण्यासाठी परिणामकारक व कालबद्ध कार्यक्रम आखण्यात यावेत, असे आदेश सर्व महानगरपालिकांना शासनाने द्यावेत व त्यानुसार परिणामकारक अंमलबजावणीचा आढावा घेण्यासाठी शासनस्तरावर उच्चस्तरीय यंत्रणा निर्माण करण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(४७) " चंद्रपूर जिल्ह्यात दारुबंदी लागू करण्याचा घेण्यात आलेला निर्णय, या निर्णयामुळे जनमानसांत उमटलेली समाधानाची भावना, दारुसारख्या व्यसनामुळे व्यसनाधीन व्यक्तींचे उध्वस्त झालेले संसार, या व्यसनामुळे तरुण पिढी वाममार्गाला जात आहे, त्यांना त्यापासून परावृत्त करणे आवश्यक आहे, तरुण पिढीचे भवितव्य अंधःकारमय होऊ नये यावर उपाय म्हणून संपूर्ण राज्यात दारुबंदी धोरण अंमलात आणावे अशी समाजाच्या विविध स्तरातून होत असलेली मागणी, या बाबी विचारात घेता संपूर्ण राज्यात दारुबंदी धोरण राबविण्यात यावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**डॉ. वजाहत मिर्झा वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ४८, ५१ व ५२**

(४८) "राज्यातील विनाअनुदान तत्वावरील माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांना अनुदानाअभावी प्रयोगशाळा, ग्रंथालये व इतर शैक्षणिक सोयी सुविधा उपलब्ध होऊ शकत नाही, त्यामुळे विद्यार्थ्यांच्या प्रगतीवर होणारा विपरीत परिणाम विचारात घेता विनाअनुदान तत्वावरील राज्यातील सर्व माध्यमिक शाळांमध्ये विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये यासाठी शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या भरती तसेच विविध आवश्यक सोयीसुविधा उपलब्ध होण्यासाठी ह्या सर्व माध्यमिक शाळांना चालू शैक्षणिक वर्षापासून १०० टक्के अनुदान देण्यात यावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(५१) "राज्यात अनेक ठिकाणी पाणी टंचाईची स्थिती निर्माण झालेली आहे. यामुळे ग्रामीण भागातील नागरीकांना चार-पाच मैल दूरवरुन पाणी आणण्याची परिस्थिती निर्माण झालेली आहे, पावसाळयातील पाण्याची अनियमितता, निसर्गाचा लहरीपणी त्यामुळे निर्माण होणारी भीषण पाणीटंचाई, परिणामी पिण्याच्या पाण्यासाठी सुध्दा नागरीकांची मोठया प्रमाणात भटकंती होत असून ही खूपच चिंताजनक बाब आहे. यावर जलतंत्रज्ञानाच्या मार्गदर्शनातून वेगवेगळ्या उपाययोजना करण्याची राज्याला आवश्यकता आहे. रेन वॉटर हार्वेस्टिंग हा त्यापैकी एक उपाय आहे. परंतु त्याबद्दलची अंमलबजावणी राज्यात होताना दिसत नाही. राज्यातील सर्व शासकीय तसेच खाजगी इमारतींच्या छतांवर पडणा-या पावसाच्या पाण्याचे एकत्रीकरण (रेन वॉटर हार्वेस्टिंग) करून त्याचे इमारतीच्या आवारातील जमिनीत पाण्याच्या स्तोत्राजवळ पुनर्भरण करण्यात यावी. त्यामुळे जलस्तोत्र पुनर्भरण होईल. तसेच शहरी भागांमध्ये हॉटेल्स, रेस्टॉरेंट व इतर ठिकाणी मोठया प्रमाणामध्ये पाण्याचा अपव्यय होताना दिसतो, तो देखील टाळण्याची आवश्यकता आहे. अशा अनेक उपाययोजना केल्यास राज्यात पिण्यासाठी, शेतीसाठी औद्योगिक कामांसाठी व इतर वापरासाठीच्या पाण्याचा प्रश्न नक्कीच मार्गी लागेल. यासाठी शासनाकडून कठोर निर्देश देण्याची गरज आहे. तसेच राज्यात खाजगी नवीन इमारत बांधकाम करीत असताना बांधकाम परवाना देण्यासाठी जसे इतर बाबी तपासण्यात येतात, तसेच राज्यातील ग्रामपंचायत ते महानगरपालिका अंतर्गत येणा-या इमारतींवरील छताचे पाणी त्या आवारातील जलस्तोत्रात सोडण्याचे नियोजन आहे किंवा कसे हे तपासूनच बांधकाम परवानग्या द्याव्यात व अशाप्रकारे विविध उपाययोजना करून पावसाचे पाणी व वैयक्तिक वापरासाठी असलेले पाणी यांचे योग्य नियोजन करण्यासाठी शासनाने अधिकाधिक उपाययोजना कराव्यात, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(५२) “ राज्यात अल्पसंख्यांक समाजातील नागरिकांची अवस्था चिंताजनक आहे, या समाजात शिक्षण व रोजगाराच्या संधी कमी प्रमाणात उपलब्ध होत असल्याने हा समाज विकासापासून वंचित आहे, राज्य शासनाच्या अनेक योजना या समाजापर्यंत पोहोचत नसल्याने या समाजाला अनेक लाभ मिळत नाहीत, मौलाना आझाद आर्थिक विकास महामंडळ हे फक्त नावापुरते उरलेले आहे, या महामंडळाद्वारे एकाही ठिकाणी एकही व्यवसायिक व थेट कर्ज पूर्ण करण्यात आले नाही, मागील तीन वर्षांपासून या महामंडळाची कार्यकारणी सुद्धा घोषित केली नसून शासनाकडून या महामंडळास निधीही उपलब्ध करून दिला जात नाही, तसेच या समाजातील हजारो विद्यार्थ्यांना अनेक वर्षांपासून शिष्यवृत्ती देखील मिळत नाही, शाळांना योग्य अनुदान देखील मिळत नसल्यामुळे शैक्षणिक क्षेत्रात देखील अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थी मागास राहत आहेत, यामुळे या समाजातील नागरिकांच्या आर्थिक व शैक्षणिक मागासलेपणामध्ये वाढ होऊन हा समाज विकासापासून दूरच राहिला आहे, या समाजाच्या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक उत्कर्षासाठी शासनाने अधिकाधिक प्रभावी उपाययोजना आखाव्यात, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

**श्री. आनंदराव पाटील वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ५३, ५४, ५७ व ५९**

(५३) “ राज्यातील ऊसतोड कामगार ऊस तोडणीसाठी वर्षातील ८ महिने घराबाहेर राहत असल्यामुळे व त्यांच्यासोबत त्यांचे संपूर्ण कुटूंबही ऊस तोडणीसाठी स्थलांतरीत होत असते. यामुळे त्यांच्या मुलांना शिक्षणापासून वंचित रहावे लागत आहे, या ऊसतोड कामगारांच्या मुलांना शिक्षणाच्या संधी उपलब्ध व्हाव्यात यासाठी राज्यातील प्रत्येक तालुक्यात ऊसतोड कामगारांच्या मुलींसाठी निवासी शाळा सुरू कराव्यात, महाविद्यालयात शिक्षण घेणा-या ऊस तोडणी कामगारांच्या मुलांसाठी शासकीय वसतीगृहांमधून निवासाची व भोजनाची व्यवस्था करावी, तसेच मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या धर्तीवर ऊसतोडणी कामगारांच्या मुलांना शाळा, महाविद्यालयांमार्फत शिष्यवृत्ती व शुल्क सवलत देण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(५४) “ केंद्र शासनाने राज्यात मुख्य रस्त्यापासून खेडे गावांना जोडण्याकरिता पंतप्रधान ग्रामसडक योजना अंमलात आणलेली आहे, त्याच धर्तीवर राज्यात पांदण रस्ता दुरुस्ती व मुख्यमंत्री सडक योजना राज्य शासनाने सुरू कराव्यात, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(५७) “ राज्यातील बहुसंख्य गावात विशेषतः उन्हाळ्यात पिण्याच्या पाण्याची भासत असलेली भीषण पाणीटंचाई, विविध कारणांमुळे बंद पडलेल्या अनेक पाणीपुरवठा योजना व त्यांच्या देखभालीत होणारी कुचराई, परिणामी ग्रामीण जनतेचे पिण्याच्या पाण्यासाठी होणारे हाल विचारात घेता पाणीटचांई

कायमस्वरुपी कमी करण्यासाठी शासनाने एक खास कार्यक्रम आखावा व त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

(५९) '' राज्यातील ग्रामपंचायत स्तरापासून मंत्रालय स्तरापर्यंत आणि ग्रामपंचायत सदस्यांपासून मुख्यमंत्र्यांपर्यंत सर्व शासकीय व निमशासकीय कार्यालयात तसेच राज्यातील एकंदरीत सर्वच शासकीय व्यवहारामध्ये मराठी भाषेचा १०० टक्के वापर होण्याच्यादृष्टीने आवश्यक ती उपाययोजना करण्याची जबाबदारी राज्य शासनाने मराठी भाषा विभागाकडे सोपवावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

**श्री. जनार्दन चांदूरकर वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ५६ व ५८**

(५६) '' राज्यातील सुशिक्षित बेरोजगारांचे वाढते प्रमाण व त्यांच्यात रोजगाराअभावी निर्माण झालेले वैफल्याचे व असंतोषाचे वातावरण लक्षात घेता बेरोजगारांची समस्या परिणामकारक पध्दतीने सोडविण्यासाठी सेवायोजन आणि रोजगार व स्वयंरोजगार कार्यालये अधिक कार्यक्षम करण्यासाठी तसेच संबंधित प्रश्नावर उपाययोजना सुचविण्यासाठी विधीमंडळाच्या दोन्ही सभागृहातील सदस्यांची एक संयुक्त समिती स्थापन करण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

(५८) '' शासनातर्फे राज्यातील मागासवर्गीय विद्यार्थ्यांना शाळा व महाविद्यालयामार्फत शिष्यवृत्ती व शुल्क सवलत दिली जाते, त्याच धर्तीवर राज्यातील अल्पभूधारक शेतकरी कुटूंबातील पाल्यांना शाळा व महाविद्यालयांमार्फत शिष्यवृत्ती व शुल्क सवलत देण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

**डॉ. सुधीर तांबे वि.प.स. यांचा ठराव क्रमांक ६१**

(६१) '' राज्यातील पूर्व प्राथमिक शिक्षणासाठी सुमारे एक लाख अंगणवाड्याची संख्या असली तरी या अंगणवाड्याद्वारे दर्जेदार पूर्व प्राथमिक शिक्षण मिळत नाही, वैद्यकीय शास्त्रानुसार लहान मुलांच्या मेंदूची ९० टक्के वाढ ही त्यांच्या सहा वर्षापर्यंत होत असते, विद्यार्थ्यांमध्ये शैक्षणिक आवड निर्माण होणे, ज्ञानेंद्रियांचा योग्य विकास होणे, तसेच बौध्दिक विकासाच्या दृष्टीने हा कालावधी अत्यंत महत्त्वाचा असल्याने यासाठी शिक्षण देण्यासाठी तज्ज्ञांची समिती गठीत करून विशेष कार्यक्रम आखावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

**श्री. सतिश चव्हाण वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ६३ व ६४**

(६३) " राष्ट्रीय स्तरावर भारतीय प्रशासकीय सेवा, भारतीय पोलीस सेवा व तत्सम विविध स्पर्धा परीक्षांमध्ये उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्यांमध्ये इतर राज्याच्या तुलनेत राज्यातील विद्यार्थ्यांचे अत्यल्प प्रमाण लक्षात घेता हे प्रमाण वाढविण्यासाठी व उमेदवारांची अद्ययावत व योग्य पद्धतीने पूर्वतयारी करून घेण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात किमान एक प्रशासकीय सेवा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याच्या दृष्टीने आवश्यक ती उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(६४) " राज्यातील ग्रामीण भागातील जिल्हापरिषद शाळांची झालेली दयनीय अवस्था विशेषतः मराठवाड्यातील शाळेच्या इमारती मोडकळीस आलेल्या अवस्थेत असून त्या विद्यार्थ्यांकरिता बसण्यायोग्य नसणे तसेच शाळांसाठी संरक्षित भिंत, पाण्याची सुविधा, मुले व मुलींसाठी स्वतंत्र स्वच्छतागृह, वृक्षारोपण यासाठी महाराष्ट्र शासनाने जिल्हापरिषदांना आवश्यक तो विशेष निधी देण्याच्या दृष्टीने कार्यवाही करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. अमरनाथ राजूरकर वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ६५, ६७, ६८, ६९ व ७०**

(६५) " राज्यात वेळोवेळी पडणा-या दुष्काळाची तीव्रता लक्षात घेता, पावसाळा संपत असतानाच पुढील वर्षभरासाठी राज्यातील पाणीसाठा जतन करण्याची आवश्यकता, राज्यातील जनतेला लागणारे पिण्याचे पाणी, शेतीसाठी लागणारे पाणी, औद्योगिक वसाहती व कारखान्यांना आणि अन्य घटकांना लागणा-या पाण्याचे न्याय वाटप होऊन प्रत्येकाला पुरेसे पाणी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने सुरुवातीपासूनच विभागवार घेतली जाणारी पिके त्या भागातील उपलब्ध पाणीसाठा व लोकसंख्या यांचा विचार करून प्रत्येक घटकाला वर्षभर पाणी कसे पुरेल याबाबत पूर्वनियोजन करून त्याची शासनस्तरावर काटेकोर अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(६७) " राज्यातत विशेषतः मराठवाड्यात सतत निर्माण होणारा भीषण दुष्काळ आणि तीव्र पाणी टंचाईची परिस्थिती लक्षात घेता दुष्काळ निवारणार्थ करावयाच्या कायमस्वरुपी उपाययोजना, मराठवाड्यात शाश्वत शेतीसाठी सिंचन अभियान सुरू करून मराठवाड्यातील सिंचनाचा जलआराखडा तयार करून त्याची अंमलबजावणी करण्यासाठी मराठवाड्यासाठी सक्षम जल आयुक्तालय सुरू करावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(६८) राज्यातील विशेषतः मराठवाड्यातील सर्व गावे बारमाही वाहतुकीसाठी योग्य व्हावीत याकरीता सर्व ग्रामीण भागातील रस्त्यांची पाहणी करून आवश्यक असेल तेथे नद्या, खाड्या, नाले व मो-या यांचेवर पूल बांधण्याची धडक योजना शासनाने हाती घ्यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(६९) “ शेतक-यांना शेती व्यवसायासाठी लागणारी रासायनिक खते, अवजारे, किटकनाशके यांच्या किंमतीमध्ये सतत होणारी वाढ, तसेच शेतक-यांना शेतीमालाचे न परवडणारे भाव विचारात घेता, उत्पादन खर्चावर आधारित असे शेतीमालाचे भाव शेतक-यांना मिळण्याच्यादृष्टीने राज्य शासनाने केंद्र शासनाकडे आग्रही भूमिका घ्यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(७०) “ राज्यातील अनेक नद्यांच्या परिसरात रासायनिक कारखाने, साखर कारखाने व अनेक प्रकारचे उद्योग उभारण्यात आले आहेत. या कारखान्यांतील प्रदूषित सांडपाणी नदीत सोडण्यात येत असल्यामुळे नदीकाठावरील अनेक गावांमध्ये विशेषतः कोकण व पश्चिम महाराष्ट्रात नद्यांचे पाणी पिण्यास अयोग्य झाले आहे. त्यामुळे रहिवाशांच्या आरोग्यावर आणि मच्छिमार बांधवाच्या उपजिविकेच्या साधनांवर विपरीत परिणाम झाला आहे. हे लक्षात घेता राज्यातील जलप्रदूषण समस्या सोडविण्यासाठी शासनाने उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

**डॉ. (श्रीमती) मनिषा कायंदे वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ७१ व ७२**

(७१) “ राज्यातील किल्ले व दुर्ग यांचे ऐतिहासिक महत्व लक्षात घेता या किल्ले व दुर्गांचा परिसर पर्यटन केंद्र म्हणून विकसित करण्यासाठी तसेच त्या ठिकाणी मार्गदर्शक नेमण्याबाबत व पर्यटकांसाठी अन्य आवश्यक त्या सोयीसुविधा उपलब्ध करून देऊन या सर्व किल्ल्यांचे व दुर्गांचे ऐतिहासिक महत्व कायम राखण्याच्या दृष्टीने शासनाने खास उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(७२) “ राज्यात उद्योग जगतात मोठ्या प्रमाणात स्थानिक भूमीपुत्रांना रोजगार उपलब्ध न होणे, उद्योगांमध्ये भूमीपुत्रांची संख्या नगण्य असल्याने राज्यात बेरोजगारांची संख्या प्रचंड प्रमाणात वाढणे, राज्यातील सेवायोजन कार्यालयांमध्ये लाखो तरूणांनी नोकरीसाठी केलेली नोंद, उद्योगांमध्ये भूमीपुत्रांना नोक-या देण्यास शासन अपयशी ठरल्याने राज्यातील सुशिक्षित तरूणांमध्ये पसरलेले नैराश्य, राज्यातील शासकीय, निमशासकीय तसेच खाजगी आस्थापनावरील कार्यालयांमध्ये नोकरी देताना भूमीपुत्रांना प्राधान्याने नोकरीत घेण्यासाठी शासनाने धोरणात्मक निर्णय घ्यावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

**श्री. रामदास आंबटकर वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ७३ व ७४**

(७३) “ राज्यात विशेषतः विदर्भात सिमेंट कारखाने, औष्णिक विद्युत ऊर्जा केंद्र (थर्मल पॉवर स्टेशन), कोळसा खाणी, छोटे मोठे पॉवर प्लाँट (ऊर्जा केंद्र), पेपर मिल या सारखे अनेक प्रकारचे

उद्योग उभारण्यात आले असून या कारखान्यातील दूषित सांडपाणी नदीत सोडल्यामुळे नदीकाठावरील अनेक गावांमध्ये विशेषतः विदर्भातील वैनगंगा, पैनगंगा, वर्धा व सिमावती भागातील नद्यांचे पाणी पिण्यास अयोग्य झाले असून त्यामुळे रहिवाश्यांच्या आरोग्यावर आणि मच्छिमार बांधवाच्या जिविकेच्या साधनांवर व जनावरांवर, पशु पक्षांवर विपरीत परिणाम झालेला दिसून येत आहे, त्यामुळे नागरीकांना नवनवीन आजारांना सामोर जावे लागत आहे, सदर गंभीर बाब लक्षात घेता राज्यातील जलप्रदूषणावर प्रभाविरित्या नियंत्रण आणण्याकरिता शासनाने कठोर उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(७४) " राज्यातील आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय विभागामार्फत चालविल्या जाणा-या शासकीय व अनुदानीत मुलींचे वसतिगृहात आश्रमशाळेतीलच कर्मचा-यांकडून अल्पवयीन मुलींचे होत असलेले लैंगिक शोषण, त्याठिकाणी पुरुष कर्मचा-यांच्या करण्यात आलेल्या नेमणूका, त्यामुळे अल्पवयीन आदिवासी मुलींवरील सतत होणा-या अत्याचाराच्या घटनेत वाढ, आदिवासी मुलींच्या शिक्षण, त्यांच्या बौद्धिक विकासावर तसेच सामाजिक जीवनावर आणि उर्वरित आयुष्यावर होत असलेला परिणाम, या पिडित मुलींना न्याय मिळण्याकरिता अत्याचार करणा-यांना कठोर शिक्षा मिळावी या करिता शासनाने तातडीने कार्यवाही करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**प्रा. अनिल सोले, वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ७६, ७७ व ७८**

(७६) " राज्यात औद्योगिक वसाहती व कारखान्यांचे वाढते प्रमाण त्यामुळे बहुतांश जिल्ह्यात वायूप्रदूषण व जलप्रदूषणाची निर्माण झालेली समस्या, कोळसाखाणी पासून होत असलेले प्रदूषण, लहान मोठे उद्योजक त्यात थर्मल पॉवर स्टेशन (औष्णिक उर्जा केंद्र), एम.आय.डी.सी. तील उद्योग, सिमेंट कारखाने, पेपर मील यापासून होत असलेले प्रदूषण, उद्योजक करारनामा करून देखील नियम पाळत नसणे, विशेषतः ज्या भागात दुर्मिळ वनसंपदा तसेच वन्यजीवांचे वास्तव्य आहे त्या भागात कोळसा खाणीसाठी परवानगी देण्याचा चाललेला प्रकार, त्यामुळे वन व वन्यजीवांचे अस्तित्व धोक्यात येणे, त्यातच शासनाला अपु-या साधनसामुग्रीमुळे प्रदूषणावर आळा घालण्याकरिता येत असलेले अपयश, परिणामी जनतेच्या आरोग्याचा निर्माण झालेला प्रश्न, यावरील नियंत्रणाकरिता शासनाने विशेष यंत्रणा निर्माण करावी तसेच पर्यावरणाचा होणारा -हास लक्षात घेता आरक्षित वनांच्या ठिकाणी देण्यात आलेले कोलब्लॉक्स रद्द करावे,अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(७७) " राज्यात विशेषतः विदर्भातील पर्यटन स्थळाचा व तिर्थक्षेत्राचा विकास पाहिजे त्या प्रमाणात झालेला नसल्यामुळे वर्धा, चंद्रपूर, गडचिरोली आणि भंडारा या मागास व आदिवासी भागांमध्ये पूर्वकालीन तिर्थक्षेत्र व पर्यटनस्थळे आहेत, या पर्यटन स्थळांचा व तिर्थक्षेत्राचा विकास परिपूर्ण झाला नाही, उदाहरणार्थ गडचिरोली जिल्ह्यात मार्कंडा येथील उत्तर वाहिनी वैनगंगा या पावन नदीच्या काठावरील मार्कंडा देवस्थान हे "विदर्भाची काशी" म्हणून संबोधण्यात येते, अशी विदर्भामध्ये अनेक तिर्थक्षेत्र व पर्यटन क्षेत्र असून सदर क्षेत्राचा विकास व्हावयास हवा होता तसा झालेला नाही. त्यामुळे विदर्भातील तिर्थक्षेत्र व पर्यटन स्थळांच्या विकासाकरिता विशेष कार्यक्रम आखून त्याकरिता निधी उपलब्ध करून देण्यात यावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(७८) " राज्यात विशेषतः ग्रामीण भागातील जिल्हापरिषद माध्यमातून ग्रामीण पाणीपुरवठा योजना राबविण्यात येत असून बहुतांश पाणीपुरवठा योजना बंद स्थितीत आहेत, सदर पाणीपुरवठा योजनेची देखभाल ही ग्रामपंचायतीकडे हस्तांतरित करण्यात आल्याने ग्रामपंचायतीची आर्थिक स्थिती व निधी अभावी बहुतांश पाणीपुरवठा योजना सुरू नाहीत, त्यामुळे ग्रामीण भागात पाण्याची टंचाई निर्माण झाली आहे, त्यामुळे सदर पाणीपुरवठा योजना सुरळीत सुरू होण्यासाठी शासनाने नळ पाणीपुरवठा योजनेकरिता स्वतंत्र निधी अथवा यंत्रणा उभी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**ॲड. हुस्नबानू खलिफे, वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ७९, ८०, ८१, ८५ व ८६**

(७९) " राज्यातील महिला व तरुण मुलींवर होणारे अत्याचार व त्यांचे होणारे मृत्यू विचारात घेता महिलांवरील अत्याचारांबाबतचे खटले विनाविलंब निकालात काढण्यासाठी प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी स्वतंत्र फास्ट ट्रॅक न्यायालये स्थापन करण्यात यावीत, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(८०) " राज्यात विशेषतः ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांच्या किनारपट्टीवरील अनेक गावांच्या संरक्षणासाठी धूप प्रतिबंधक बंधारे बांधण्यात आलेले आहेत. दरवर्षी हे बंधारे फुटल्यामुळे समुद्राचे खारे पाणी शेत जमिनीत शिरून शेतीचे व झाडांचे नुकसान होते, दिवसेंदिवस समुद्राच्या आक्रमणाची वाढती तीव्रता व परिणामी लोकांच्या मालमत्तेचे मोठ्या प्रमाणात होत असलेले नुकसान लक्षात घेता समुद्राच्या वाढत्या अतिक्रमणाचा गंभीर स्वरूपाचा धोका निर्माण होऊ नये यासाठी शासनाने या चारही जिल्ह्यांतील किनारपट्टीवरील गावांच्या संरक्षणासाठी नियोजनबद्ध व कालबद्ध कार्यक्रम आखून त्वरित अंमलबजावणी करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(८१) “ राज्यात शासनामार्फत चालविण्यात येणा-या शेकडो वसतिगृहात निवास करून अध्ययन करीत असलेल्या हजारो विद्यार्थी-विद्यार्थिनींना दर्जात्मक शिक्षण, सकस आहार, आरोग्य विषयक सुविधा तसेच योग्य सुरक्षा मिळत नसल्यामुळे त्यांचा शारीरिक व बौद्धिक विकास खुंटत आहे. तसेच त्यांच्या सुरक्षेबाबत वारंवार वाईट घटना घडत आहेत. या विद्यार्थी-विद्यार्थिनींना आवश्यक त्या सोयीसुविधा व सुरक्षा मिळण्यासाठी शासनाने कालबद्ध कार्यक्रम आखावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(८५) “ राज्यातील अनेक नद्यांच्या परिसरात रासायनिक कारखाने, साखर कारखाने, एम.आय.डी.सी. व अनेक प्रकारचे उद्योग उभारण्यात आले असून या कारखान्यांतील रसायन मिश्रित प्रदूषित सांडपाणी नदीपात्रात सोडण्यात येत असल्याने नदीकाठावरील अनेक गावांमध्ये विशेषतः कोकणातील नद्यांचे पाणी पिण्यास अयोग्य झाले आहे, या नद्यांच्या पाण्यातील जीवसृष्टी नष्ट होत चालली असून, या प्रदूषित पाण्याचा नागरिकांच्या आरोग्यावर व मच्छिमार बांधवांच्या जीविकेच्या साधनांवर होणारा विपरीत परिणाम लक्षात घेता, राज्यातील वाढत्या जलप्रदूषणाच्या समस्येवर उपाय शोधून जलप्रदूषणास कायमस्वरूपी आळा घालण्यासाठी शासनाने उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(८६) “ कोकणातील भूभागांपैकी सुमारे ५३.४५ टक्के पडीत असलेल्या जमिनीत आंबा, काजू, सुपारी, कोकम, नारळ इत्यादी फळ वृक्षांची लागवड आणि साग, शिसम, ऐन, किंजळ, खैर इत्यादी वनराई वृक्षांची पद्धतशीर लागवड करण्याच्यादृष्टीने धडक कार्यक्रम हाती घेऊन या कार्यक्रमासाठी आर्थिक तरतूद व अन्य उपाययोजना करण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

**श्री. नागोराव गाणार, वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ८२ व ८४**

(८२) “ राज्यातील मुलांना सुदृढ व समृद्ध बनविण्याच्या दृष्टीकोनातून शाळेतील मुलांसाठी राबविण्यात येणारी मध्यान्ह शालेय पोषण आहार योजना संबंधित शाळेकडून कार्यान्वित करण्यात येत असते, त्यामुळे शाळेतील सर्व शिक्षकांना या योजनेवर लक्ष केंद्रीत करावे लागते, शालेय पोषण आहार योजनेसंबंधी आठवड्यातून दोन वेळा बैठकींचे आयोजन करण्यात येत असल्यामुळे विद्यार्थ्यांना शिकवावयाच्या विषयाकडे दुर्लक्ष होते, यासर्वांचा परिणाम अध्यापन प्रक्रियेवर होतो, या योजनेसाठी मानधन नियमित स्वरुपात मिळत नसल्यामुळे मदतनीसांना आर्थिक समस्येला तोंड द्यावे लागते,

शालेय पोषण आहाराच्या विविध तक्रारी येत असल्यामुळे शाळेतील मुख्याध्यापक, शिक्षक यांच्यावर कारण नसताना गंभीर गुन्ह्यांची नोंद होते, यातून शिक्षकांना प्रचंड अशा मानसिक तणावाला सामोरे जावे लागते, यामुळे शाळेतील मुलांसाठी राबविण्यात येणारा मध्यान्ह शालेय पोषण आहार हवाबंद डब्यातून ग्रामीण भागातील मुलांना स्वतंत्र यंत्रणेमार्फत पुरविण्यात यावा, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

(८४) '' राज्यातील विनाअनुदान तत्वावर मान्यता देवून सुरू करण्यात आलेल्या माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांना अनुदानाअभावी प्रयोगशाळा, ग्रंथालये व इतर शैक्षणिक सोयी सुविधा उपलब्ध होऊ शकत नाही, त्यामुळे विद्यार्थ्यांच्या प्रगतीवर होणारा विपरीत परिणाम विचारात घेता विनाअनुदान तत्वावर मान्यता दिलेल्या राज्यातील सर्व माध्यमिक शाळांना चालू शैक्षणिक वर्षापासून १०० टक्के अनुदान देण्यात यावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

**डॉ. रणजित पाटील, वि.प.स. यांचे ठराव क्रमांक ९२, ९३, ९४ व ९५**

(९२) '' राज्यातील सुशिक्षित बेरोजगारांचे वाढते प्रमाण व त्यांच्यामध्ये रोजगाराअभावी निर्माण झालेले वैफल्याचे व असंतोषाचे वातावरण लक्षात घेता बेरोजगारांची समस्या परिणामकारक पद्धतीने सोडविण्यासाठी सेवायोजन आणि रोजगार व स्वयंरोजगार कार्यालये अधिक कार्यक्षम करण्यासाठी तसेच संबंधित प्रश्नावर उपाययोजना सुचविण्यासाठी विधिमंडळाच्या दोन्ही सभागृहातील सदस्यांची एक संयुक्त समिती स्थापन करण्यात यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

(९३) '' विदर्भात नापिकी, अतिवृष्टी, जलप्रकोप, दुबार पेरणी, तिबार पेरणी, ओला व कोरडा दुष्काळ असूनही पीक विमा नुकसान भरपाईपासून आणेवारी व उंबरठा उत्पन्नाच्या जाचक निकषामुळे शेतकरी वंचित राहत आहेत, याला शंभर वर्ष जुनी ब्रिटिशकालीन आणेवारी व उंबरठा काढण्याचे निकष कारणीभूत असल्याने त्यात बदल करून सुधारित आणेवारी व उंबरठा काढण्याचे निकष तयार करण्यासाठी राज्य शासनाने केंद्र शासनाकडे आग्रही भूमिका घ्यावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

(९४) '' राज्यातील सर्व विद्यार्थ्यांना घ्यावयाचे सर्व माध्यमातील शिक्षण हे अधिक परिणामकारक, प्रभावी होण्यासाठी आणि भविष्यात सक्षम पिढी उभी राहण्यासाठी सर्व शिक्षण विभाग (शालेय शिक्षण, उच्च शिक्षण, तंत्रशिक्षण, आश्रमशाळा, अंध, अपंग, मूक-बधिर शाळा, आदिवासी आश्रम शाळा) हे मंत्रालयातील एकाच विभागाच्या अधिपत्याखाली आणावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.''

(९५) " राज्यात ४१७ ठिकाणी सरकारी औद्योगिक प्रशिक्षण केंद्र (आयटीआय) उपलब्ध असून तेथे १७८ एवढेच पाठ्यक्रम वर्ग चालविले जातात, त्यातील अनेक पाठ्यक्रम हे कालबाह्य झाले असून विविध क्षेत्रात आधुनिक तंत्रज्ञान आले असतानाही जुन्याच तंत्रज्ञानावर आधारीत प्रशिक्षण दिले जात आहे, औद्योगिक प्रशिक्षण केंद्रामध्ये (आयटीआय) प्रशिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांच्या ज्ञानात भर पडण्यासाठी नवीन पाठ्यक्रम सुरू करण्याची आवश्यकता, यासाठी राज्य शासनाने उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. रामनिवास सिंह, वि.प.स. यांचा ठराव क्रमांक ९७**

(९७) " राज्यातील किल्ले व दुर्ग यांचे ऐतिहासिक महत्व लक्षात घेता या किल्ले व दुर्गांचा परिसर पर्यटन केंद्र म्हणून विकसित करण्यासाठी तसेच त्या ठिकाणी मार्गदर्शक नेमण्याबाबत व पर्यटकांसाठी अन्य आवश्यक त्या सोयीसुविधा उपलब्ध करून देवून या सर्व किल्ल्यांचे व दुर्गांचे ऐतिहासिक महत्व कायम राखण्याच्या दृष्टीने शासनाने खास उपाययोजना करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

**श्री. प्रकाश गजभिये, वि.प.स. यांचे ठराव क्रमांक १०८, १०९, १११ व ११२**

(१०८) " दादर, मुंबई येथे भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे चैत्यभूमी येथे स्मारक आहे. तसेच डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे वास्तव्य दादर येथे हिंदू कॉलनीत राजगृह येथे होते, आताही राजगृहात डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या वस्तू ठेवण्यात आल्या आहेत. दिनांक १४ एप्रिल व ६ डिसेंबर या दिवशी या महामानवाचे नाव चिरंतर स्मरणात रहावे, यासाठी दादर रेल्वेस्थानकाला डॉ. बाबासाहेब आंबेडकर रेल्वेस्थानक असे नाव द्यावे अशी राज्यातील सर्व अनुयायी यांची फार पूर्वीपासून मागणी आहे, ही मागणी अद्यापही मान्य न झाल्यामुळे त्यांच्यात तीव्र असंतोष निर्माण झाला आहे. अतः दादर रेल्वेस्थानकाला " डॉ.बाबासाहेब आंबेडकर " रेल्वे स्थानक असे नाव द्यावे, अशी शिफारस राज्य शासनाने केंद्र शासनाला करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(१०९) " महाराष्ट्र राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात लाखो विद्यार्थी शिक्षण घेत आहेत, विद्यार्थ्यांच्या राज्यभर जिल्हास्तरीय क्रीडा, सांस्कृतिक, सामाजिक नाट्य, वादविवाद स्पर्धा शासनातर्फे आयोजित केल्या जातात, या विद्यार्थ्यांची निवासाची व्यवस्था होत नसल्यामुळे स्पर्धेचे यशस्वी आयोजन होत नाही, त्यामुळे या विद्यार्थ्यांवर अन्याय होतो, त्यांची होणारी गैरसोय टाळण्याकरिता व स्पर्धांचे आयोजन योग्यरितीने होण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यात शासनातर्फे महात्मा ज्योतिबा फुले विद्यार्थी भवन बांधून त्यांची योग्य ती देखभाल करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे."

(१११) “ महाराष्ट्र राज्यातील कायम विनाअनुदान तत्वावरील २००१ पूर्वी मान्यता असलेल्या महाविद्यालयातील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक सोयीसुविधासाठी महाविद्यालयांना १०० टक्के अनुदान प्रदान करण्यात यावे, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

(११२) “ दादर, मुंबई येथे भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे चैत्यभूमी येथे स्मारक आहे, तसेच डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे वास्तव्य दादर येथे हिंदू कॉलनीत राजगृह येथे होते, आताही राजगृहात डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या वस्तू ठेवण्यात आल्या आहेत, दिनांक १४ एप्रिल व ६ डिसेंबर या दिवशी या महामानवाचे नाव चिरंतर स्मरणात रहावे यासाठी दादर रेल्वे स्थानकाला “डॉ.बाबासाहेब आंबेडकर” रेल्वेस्थानक असे नाव द्यावे अशी राज्यातील सर्व अनुयायी यांची फार पूर्वीपासूनची मागणी आहे, ही अद्यापही मान्य न झाल्यामुळे त्यांच्यात तीव्र असंतोष निर्माण झाला आहे, अतः दादर रेल्वेस्थानकाला “ डॉ. बाबासाहेब आंबेडकर ” रेल्वेस्थानक असे नाव द्यावे, अशी शिफारस राज्य शासनाने केंद्र शासनाला करावी, अशी शिफारस ही विधानपरिषद शासनास करीत आहे.”

**अठरा** : सर्वसाधारण सार्वजनिक हितसंबंधाच्या बाबी

**एकोणीस** : सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेली कागदपत्रे (यादी स्वतंत्रपणे वितरित करण्यात आली आहे.)

**विधान भवन :**
मुंबई,
दिनांक २० फेब्रुवारी २०२०.

**राजेंद्र भागवत,**
सचिव (कार्यभार),
महाराष्ट्र विधानपरिषद.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई